## संपादक मंडळ



## मांडणी व सजावट

***Last Bench Designs***

## संपर्क

**ई साहित्य प्रतिष्ठान**
जी ११०२, ईटर्निटी
मॅरेथान चौक
ठाणे - ४००६००४.

☎ **९८६९६७४८२०**

➦ *हा अंक विनामुल्य मिळवण्यासाठी तसेच सुचना, अभिप्राय व प्रतिक्रियांसाठी*

✉ **netaksharee@gmail.com**

# व्यापुनी ही धरा अवघी तरीही तु धरती वरी

वाहते सरिता जणु पान्हावली भू माऊली
शमविण्यास क्षुधा तृष्णा प्राणीजनां साठी

का अश्रुधारा तिच्या करंट्या लेकरांन मुळी
असेल काही जरी तरी तु अमृता परी

पद्मीनी जीवनदायीनी
अर्पीत अभिषेक ईश्वरा प्रती

सर होऊनी पावसाची प्रेम जणु बरसते
प्रणयी प्रकृती मोहरते,बहरते सजते
लेकरास वात्सल्य चिंब करुन जाते

सागरी गहिऱ्या अथांग जणु ध्यान मग्न शिव तु
भंगता समाधी तीच रुद्र तोच तांडवस्थ

नाचती धावती लाट किनाऱ्या कडे
थिरकती अवखळ यौवना कुणी

संन्यस्थ योगी कुणी शांतश्या जलाशयी
का कलेत धुंद कला योगी कुणी
रुप तुझे अनंत सर्व व्यापी

थेंब थेंब अश्रु नयना नयानांमधी
थेंब थेंब ओघळता पाना पानांवरी

पसरती लाली गुलाबी लाजुनी प्रियेसी जशी
नितळ निळायी ही आकाश अलिंगनी

व्यर्थ तुझ विण सारे जीवन अस्तीत्व न ऊरे
जल निर्मळ खरे जल सत्य सुंदर पवित्र जल हे...



**मंगेश मेढी...**

*mangeshmedhi@gmail.com*

# पाणी

मलीन झाल्या माणसाला नित्य धुतले असते कुणी
असते मळके जीवन किती जर नसते जगात पाणी

आसमंत ही याने धुतले धारीत्रीस न्हाऊ घातले
पिकात सोने ओतले जीवात जीवभरले

आभाळी टांगला साठा समस्त विश्वास पुरवठा
दोन अक्षरी जरी छोटा विस्तार शब्दाचा मोठा

बाण धारांचे अगणितधरणीदिशे सुसाट वेगात
पान-फुलांना हसवितगवत-वृक्षांना खुलवित

द़र्‍या- खोऱ्यातून उगम याचा धर्म बेबंद वाहण्याचा
नदी -सागरी उसळण्याचा तलावी संथ थांबण्याचा

बसले जाऊनी नारळात शुद्ध तीर्थ देवपूजेत
खारे अश्रू नयनात म्हणवले काळे तुरुंगात

देखता मिष्टान्न जीव्हेस सुटले लढाईतकुणी कुणास पाजले
कुणाच्या डोक्यावरूनी गेले अनंत जीव यात पोहले

गंगाजळाचा एक घोट मरणांत मनूचा शेवट
याच्याविण फडफडला मासा पडला कोरडा ही घसा

अंगांग ही यातची भिजले पुरात सर्वस्व बुडाले
काचांवारी हे ओघळले आड विहिरीतुनी लपले



रंग तयाचा सुंदर असा जयात मिसळा झाला तसा
छत्रीचा हा मित्र असा भेटे तिज वारंवार कसा

पाटाचे पाणी वहात , कधी हृदय पाणी-पाणी होत
अग्नीस करे हे गिळंकृत , कमळ तयावर तरंगत

वाळवंटी हरवावे , भूगर्भी सापडावे
कसे यासी समजावे , अचंब्यास काय म्हणावे ?

महासागर याने भरले , पृथ्वी-गोला पाठी लादले
तरीही कधी न सांडले , नवलच नव्हे का हे भले ?

सृष्टी शिम्पते याचे सडे, मोती -शिंपला यात घडे
थेंबात याच्या शक्ती दडे , उर्जेने भरले अमाप घडे

प्राण-वायू यात घटक , पंचमहाभूतात हे एक
तडतडली जमीन याच्याविण, दुष्काळ क्रूर तो अति-कठीण

नौकेस हळुवार डोलवते, धूड जहाज सहज पेलते
वादळात खवळते , विध्वंसक लाटा आणते

तवंग याच्या गालावर खळी , हंस विहरत डोह-जळी
थिजुनी याचा बर्फ , उकळूनी याची वाफ

अमृत हे असे सृष्टी-निर्मिती , उपकार तिचे आम्हावर किती
कोटी प्रणाम हे तिज चरणी ,

भेट-वस्तू दिली जयाचे नाव पाणी !

*- नंदकुमार देशपांडे* deshnand@gmail.com

# डोंगर आणि पाणी

चारी बाजूंस उंच डोंगर
पहाडी बांध्याचे
दुतर्फा झाडांची उंच फौज ओळीने
खडकांना सुरुंग लावीत विस्तारलेली पाळेमुळे

कड्यावरून दरीमध्ये अंग झोकून देणारे
शुभ्र, शुध्द पाणी
फेसाळणारे, ठेचाळणारे
सुसाटत, खळाळत बेबंद वाहणारे
खडकांवर आपटून उंच उशी घेणारे

डोंगरांचे उग्र चेहरे
शतकानुशतके एका जागी निश्चल उभे राहून
पर्वतांच्या घराण्याची परंपरा सांभाळणारे
पाणी मात्र सतत वाहते
खोडकर मुलासारखे
एका जागी फार वेळ बसूंच न शकणारे
रागीट, तापट डोंगरांच्या कडेकोट बंदोबस्तातून
नजर चुकवून पळणारे
निसर्गाचे यात्री बनून दूरदेशी जाणारे

डोंगरांना वाटते अभेद्य आपण
पाण्याचे मार्ग मात्र गनीमी काव्याचे
अभेद्य खडकांना ओरखडून ओरबाडून
धुवून धुपून नेणारे
डोंगराचे मोठे लचके तोडून फोडून टाकणारे

प्रचंड बळकट डोंगर, पोलादी ताकदीचे
अचपळ मृदु पाणी, चंचल तसेच चिकाटीचे
हीच शक्ती त्या पाण्याची, अखेर बाजी जिंकणारी
उंच उंच डोंगरांवर हंसत मात करणारी!

*कुंदा जोशी, फिलाडेल्फिया* - **kundasjoshi@gmail.com**

# रंग माझा वेगळा...

रूप जळाचे निळे सावळे, सरीसरींतून लडीवाळ
घराघरांवर गिरीशिखरांवर, नर्तन लाडीक वेल्हाळ

उभ्या अंगणी साचून पाणी, झळके कंकण पा-याचे
तरंग उठवी नाजूक साजूक, चाळे भलते वा-याचे

तुझी निळाई आकाशाशी, अथांग होऊन सजलेली
फ़ेनफ़ुलांच्या रांगोळीगत, रेतीवरती भिजलेली

दरी-खो-यातुन थिरकत जाई, चाळ बांधुनी मोत्यांचे
ओले हिरवे अंग मोहरे, गवताच्याही पात्यांचे

फ़ुलून आले भिजताना मी, रोमरोमी उमटे ठसा
सांग एकदा कानी माझ्या, 'पाण्या तुझा रंग कसा?'

थोडी खळखळ करुन वदले, ''निळा-काळा, कधी जांभळा
रंगुनी रंगात सा-या.. रंग माझा वेगळा....''

प्राजक्ता पटवर्धन
**praaju.patwardhan@gmail.com**

## "बांध"

प्रचंड ओढ असलेल्या
धरणा जवळच्या...
पाण्यात, मला मीच
दिसते कायम...

घट्ट दाबलेली खळखळ,
खोल खोल साठलेली कळकळ,
अंगावर उमटलेली हिरवळ,
मनातली तळमळ...

नसानसातला उसळता उत्साह
हृदयाचे जाणवणारे ठोके
श्वासाची वाढलेली लय....
ओसंडून वाहण्याची ओढ
.
.
.
.
.
.
आणि तू घातलेला "बांध"


**मनिषा नाईक (माऊ )**
**nmani15@gmail.com**


## पाणी

कोरडवाहू चा मी साक्षीदार
थेंबासाठी जीव तडपतो आहे
अश्याच एका पाणी प्रश्नासाठी
देश आपला पेटतो आहे
पाण्यामागे पळताना
पाण्यासाठी जळताना
हा देश पाहिलाय मी
पाण्यासाठी मरताना
तू जगभरात आहेस वाहिलेला
तरीही माणूस आहे तहानलेला

तरीही माणूस आहे तहानलेला .....


शिवदास अष्टेकर

shivdas.ashtekar@gmail.com

## पाणी........

"तुझा रंग असे निर्मळ..
निस्वार्स्थ निरहंकार.."

" तुझी चव असे अमृतापरी गोड
करी मन तृप्त आणि शांत..."

" तुजवाचून जगणे व्यर्थ..
तुजवाचून मरणे व्यर्थ...."

"जगण्यास देई सामर्थ्य..
अन एक थेंब नेई परलोकांत..."

"तुझा अंश असे मातेच्या दुधात
व्यक्त करण्या प्रेमभावना
ओघळतील त्या अश्रूधारांत..."

" ना तू खेळ मांडशी धर्म आणि जातीचा
खूप खूप उपकार तुझे
सांग मी फ़ेडू पांग कसे....."

स्वाती गोसावी
swatigosavi40@gmail.com

## विसंगति

समुद्र किनारी
लाटांच्या शेजारी
माणसांच्या संसारी
रखरखत्या रेतीवरी
तहानलेल्या अंतरी
घुमताहेत स्वर :

" मनी ' जीवन ' - आस आहे ,
अथांग ' जीवन ' समोर आहे ;
पण हाय्---------- !
मिश्रित ' क्षार ' - बहुत्वामुळे
ते वर्ज्य आहे मला ;
सर्वस्वी वर्ज्य ! "

प्रभा प्रभुदेसाई
prabhapd@gmail.com

## पाणी, पाणी, पाणी

आमची मुंबईची राहणी

पाण्याची चणचण कायमची

पळायचे तोंडचे पाणी

नळावर भांडली माणसे मोठी

वाटून घेतली वेळ पाण्याची

आम्हाला वाटे मजाच सारी

जरी लागली रांग नळापाशी

बादलीत जमवायचे पावसाचे पाणी

गळणाऱ्या छपराची कृपा समजायची

रस्त्याकडेच्या ओढ्यात नाव कागदाची

इतरांबरोबर शर्यत लागायची तिची

उन्हाळ्यात शोधायची हिमालयाची सावली

झुळझुळणारे झरे, धावणारी नदी

शांत तलावात डोलणारी होडकी

विसरा आता चणचण पाण्याची

या परत, संपली सुट्टी

करा आराधना आता नळराजाची

त्यातही आहे गम्मत खाशी

नळावरच्या भांडणाची रीतच न्यारी.

**राजश्री जोगळेकर** jsrnaus@gmail.com

पाणी

घनगर्द आभाळातल्या
सहस्त्र धारांतून
मनमुक्त बरसणारे
जीवन असतं पाणी !

सतत काळजी
करणाऱ्या
आईच्या डोळ्यातला
ओलावा असतं पाणी !

दऱ्या खोऱ्यातून धावत
खळाळत झरत
नदीत विसावणारा
प्रवाह असतं पाणी !

तळपत्या उन्हात
कष्टणाऱ्या बांधवांच्या
तनुवर ओघळणाऱ्या
घर्मधारा असतं पाणी !

कठीण खड्कातल्या
काळ्या कातळातून
धबाबा कोसळणारे
तोय असतं पाणी !

गूढ गाभारयातल्या
अभिषेकपात्रातून
शिवपिंडीवर झरणारे
जल असतं पाणी !

सानुल्या सुर्याकिरणात
अलवार पाकळीवर
चकाकणारा
दवबिंदू असतं पाणी !

चरचरणाऱ्या वेदनेला
सोसताना
खळकन निसटणारा
अश्रू असतं पाणी !

आणि...

खळांची व्यंकटी सांडून
सत्कर्मी रती वाढवणाऱ्या
ज्ञानदेवांच्या पसायदानातला
अर्णव असतं पाणी !


**सुनिता पिम्प्रीकर**

sunita.pimprikar@idbi.co.in

# पाणी

माझ्या आठवणीतला पहिला पाऊस किती
जोरदार
हरवला नदीकाठ, पाण्याला कोण अडवणार
शाळा माझी एकाकाठी, गांव दुस-या
काठावर
अवघा एकच अरुंद पूल, शाळा गांवाला
जोडणार
जाता पाणी पुलावरुनी , शाळेला होई सुट्टी
पाणी लागता उंबरठ्याला, सोडल्या कागदी
बोटी
घरी बसल्या बसल्या आमची होई
करमणूक
जाता पाणी पुलावरूनी, शाळेला होई सुट्टी
पाणी लागता उंब-याला , सोडल्या कागदी
बोटी
घरी बसल्या बसल्या आमुची होई
करमणूक
स्मृती वसिष्ठ्येच्या बालमनीच्या, अजून
केले जपणूक
आज वाटते, तेव्हाच आसावले असते पाणी
सह्याद्रीच्या पोटी खणून वळवले असते
पाणी
त्या देशावरी झाला नसता दुष्काळ
आज आहे तसा, नसता दरोडेखोरांचा
सुकाळ

कृष्णकुमार प्रधान
**krishnakumarpradhan@gmail.com**

# पाणी

"....पाणीच पाणी चहुकडे ग बाई गेला मोहन
कुणीकडे....."
रेडिओवर लागलंय गाणं जुनं
ती बिछान्यावर पडून रोहनला बोलावते
"ए मोहन" तो तिच्याकडे पहातो
प्रश्नार्थक चेहरा करून ती म्हणते त्याचं गाण्याकडं
लक्ष वेधून
"ए रोहन, तूच माझा मोहन विचारात कसल्या
आहेस पण?"
**
आलेलं पहाटून तो नुकताच आलेला
नाईट्शिफ़्ट करून येताना टपो-या मोग-याचा
गजरा घेऊन
म्हणूनच कदाचित आलेला मोहरून
रोहन रोहन रोहन तिच्या हाका ऐकून
त्याला वाटतं ती बोलवते आहे गजरा पाहून
तो जातो खिडकीशी पावसाचं पाणी
पागोळ्यातून ठिबकताना पाहून
मोग-यावर घेतो दोन थेंब आणि
हळुवारपणे तिच्या केसात गजरा माळून
तिचे क्षीणपणे थरथरणारे ओठ पाहून
विचारतो तिला "काय हवंय ग तुला? गजरा
आवडला?"
**
ती उत्तरते मान हलवून
"घसा कोरडलाय...पाणी घोटभर आण"
त्याला जाणवतं जवळ आलाय तो दुर्दैवी क्षण
तो उचलतो जवळचाच प्याला
तोही अभागी रीकामा झालेला
धावतो माजघराकडे तिच्या खोलीतून
माजघरात नळ थोड्याच वेळेपूर्वी कधीतरी आलेला
सुरसुरत फुरफुरत गंजकं पाणी मोरीत पडून
सांडवाटेनं जातंय अंगणातल्या केळीला मिळून
**
प्याला माठात बुचकळून
पाणी तिच्यासाठी घेऊन धावतो रोहन.....
पोचतो का तो तिच्यापर्यंत
ती वाट पहाते आहे आसुसून
**
गंगाजल तिच्या मुखी घालून
तो डोळ्यातलं पाणी टाकतो पुसून
**
पाणी,
आपलं सर्वांचं जीवन
घोटाघोटाला तिची आठवण देऊन
करतं त्याच्या जीवनावर आक्रमण

**सतीश कर्णिक**

sk120148@gmail.com

# बारा लाख वाचकांसाठी ई चळवळ

तीन वर्षापूर्वी स्थापन झालेल्या ई साहित्य प्रतिष्ठानने आजवर आपल्या वाचकांना दिडशेहन अधिक पुस्तके विनामुल्य दिली. मोरया , मीरा, कृष्ण, गुरुदेव रविंद्रनाथ, स्वामी विवेकानंद, विंदा करंदीकर, ना. धो. महानोर, ग्रेस, नारायण सुर्वे, लोकमान्य टिळक, छत्रपती शिवाजी महाराज असे एकाहून एक सरस विषय आम्ही घेतले. सुमारे ४०० नविन साहित्यिकांना लोकांसमोर आणले. इंटरनेट्वर मराठी भाषेतील साहित्य लोकप्रिय करण्याची चळवळ हिरीरीने पुढे नेली.

प्रेम आणि सौंदर्याबरोबरच आत्महत्या आणि दहशतवाद अशा विषयांवरच साहित्य मांडल. विनोदाला वाहिलेलं ई-श्टाप देऊन हसवलं. लहान मुलांसाठी बालनेटाक्षरीची निर्मिती केली. शास्त्रीय संगीतासाठी संगीत कानसेनचे वर्ग चालवले.

नव्या कवींसाठी एक भक्कम व्यासपीठ म्हणजे नेटाक्षरी चालवले. तर महाराष्ट्रातील किल्ल्यांची माहिती देणा-या पुस्तिका "दुर्ग दुर्गट भारी" द्वारे महाराष्ट्रातल्याच नव्हे तर जगातल्या मराठी मंडळींना उभारी दिली. लाखभर रसिकांपर्यंत दर्जेदार साहित्य नियमितपणे विनामुल्य पोचवण्याची आमची परंपराआम्ही अधिक जोमाने चालू ठेवूच. आम्हाला हा उत्साह आणि प्रेरणा देणारी आपली पत्रेही येत राहूदे. पण मनात एक विचार येतो. आपली वाचकसंख्या फक्त लाखभर लोकांपर्यंतच मर्यादित का? १२ कोटी मराठी माणसांपैकी निदान १२ लाख वाचकांपर्यंत तरी हे विनामूल्य साहित्य पोचलचं पाहिजे असं नाही वाटत आपल्याला ? आणि त्यासाठी काही फार करायची गरज नाही. आपल्या ओळखीच्या १२ लोकांची, १२ मराठी लोकांची ईमेल आयडी द्याल?? जास्त दिलीत तरी हरकत नाही पण निदान १२ लोकांची ईमेल आयडी पाठवा. एक लाख लोकांनी जर प्रत्येकी १२ आयडी पाठवले तर लाखाचे १२ लाख व्हायला कितीसा वेळ लागणार ? बारा लोकांची मेल आयडी पाठवणा-या वाचकांना आम्ही ई साहित्य प्रतिष्ठानचे पाठीराखे म्हणून मानाचे स्थान देऊ. तुम्हाला आमच्या पुढील प्रवासाची कल्पना देत राहू. तुमच्या सुचना मागवत राहू. मार्गदर्शन घेत राहू. आमच्या पुढील प्रवासाचे तुम्ही सहप्रवासी असाल.

तर होणार ना ई-साहित्य प्रतिष्ठानचे पाठीराखे ??

फक्त आपल्या खास मराठी मित्र, नातेवाईकांच्या १२ मेल आयडी खालील पत्त्यावर पाठवा.

esahity@gmail.com

खात्री बाळगा या मेल आयडीचा कोणत्याही प्रकारे गैरवापर केला जाणार नाही. जाहिराती अथवा भलभलत्या मेल पाठवून त्रास देणार नाही. याचा उपयोग केवळ चांगले मराठी साहित्य पाठवण्यासाठी केला जाईल.

:अधिक माहितीसाठी :

संकेत स्थळ

www.esahity.com

फेसबुक

https://www.facebook.com/esahity

धन्यवाद !!